<u>लेखाशिर्ष-८६७४ खालील प्रतिभूती ठेवी</u>
**साठवण तलाव कौठाळी ता. उत्तर सोलापूर जि. सोलापूर. (भूसंपादन निधी)**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : भूसंपा-२०२५/प्र.क्र.१५७/जल-४**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १७ फेब्रुवारी, २०२५.

<u>वाचा</u>: १) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.न्याखभ-२०१५/प्र.क्र.१९६/अर्थ-२,दि.१२ /०८/२०१४ आणि क्र. न्याखभ-२०१५/ प्र.क्र.१३१/अर्थ-२,दिनांक ३ जून, २०१५.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५.
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे यांचे पत्र क्र. लेशा / २९३, दिनांक ०५/०२/२०२५.

<u>प्रस्तावना</u>: साठवण तलाव कौठाळी ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर या राज्य योजनेतील प्रकल्पाशी संबंधित भूसंपादन प्रकरण क्र. एस आर क्र. ८/०६ मधील एल.ए.आर. क्रमांक ३५/२०११, ३९ ते ४३/२०११, ४५ ते ५०/२०११, ५६/२०११, ५७/२०११, ५९/२०११, ६६/२०११, ७५/२०११, ७७/२०११, ९३/२०११ व ९७/२०११ मध्ये संपादित जमीनीच्या वाढीव मोबदल्यासंदर्भात मा. सहदिवाणी न्यायाधीश (वरिष्ठ स्तर) सोलापूर यांनी दिनांक १६/०४/२०२२ रोजी दिलेल्या निर्णयाच्या विरुध्द मा. उच्च न्यायालय, खंडपीठ मुंबई येथे प्रथम अपील (एफ.ए.एस.टी.) क्रमांक अनुक्रमे २४२९०, २५१६७, २५२१२, २५९३६, ३१४७३, २५८२५, २७८२४, २५८२९, २७७८०, २५८३९, २७६२१, २९१०३, २८८९८, २५२०९, २५३३५, २५१२५, २५१६०, २५३३२, २७९१७ व २५१७१/२०२३ द्वारे सिव्हील ॲप्लिकेशन्स दाखल करण्यात आली होती. त्यावर मा. उच्च न्यायालयाने दि. २०/१२/२०२४ रोजीच्या आदेशान्वये वाढीव मोबदल्याची रक्कम दिनांक १९/०२/२०२५ पर्यंत जमा करण्याबाबत आदेशित केले आहे. त्यानुषंगाने प्राप्त संदर्भिय क्र. ३ येथील प्रस्तावावर वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रकांमधील सूचना विचारात घेवून खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**<u>निर्णय</u> : साठवण तलाव कौठाळी ता. उत्तर सोलापूर, जि. सोलापूर येथील ( जलसंधारण) प्रकल्पाशी संबंधित उपरोक्त भूसंदर्भाबाबत मा. उच्च न्यायालयाचे आदेशानुसार एकूण रुपये ५.८२ कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी ब्याऐंशी लक्ष फक्त) इतकी वाढीव मोबदल्याची व व्याजाची रक्कम मा. न्यायालयामध्ये जमा करण्यासाठी याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.**

२. जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सोलापूर व उप जिल्हाधिकारी तथा भूसंपादन अधिकारी क्र.१, सोलापूर यांनी पुढील अटींची तातडीने पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी :-

अ) उपरोक्त रक्कम जमा करण्यासाठी झालेला विलंब क्षमार्पित करण्याची व त्यानुषंगाने ही रक्कम जमा करण्यासाठी मुदत वाढवून मिळण्याची विनंती मा. न्यायालयास करण्यात यावी.

ब) त्यानतंर सदरहू मंजुर झालेल्या रक्कमेचा तातडीने न्यायालयात भरणा करावा व चलनाची प्रमाणित प्रत त्वरेने शासनास सादर करावी.

क) प्रस्तुत न्यायालयीन प्रकरणात मा. वरिष्ठ न्यायालयाचा अंतिम निर्णय लागल्याशिवाय किंवा वरिष्ठ न्यायालयाच्या निदेशाशिवाय तसेच राष्ट्रीयकृत बँकेच्या हमीशिवाय (राष्ट्रीयकृत बँकेची हमी उच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयापर्यंत Valid असणे आवश्यक राहील.) संबंधितांना रक्कम वितरीत करण्यात येवू नये, अशी लेखी विंनंती सरकारी वकीलांमार्फत न्यायालयास करण्यात यावी.

इ) या प्रकरणी कोणत्याही खातेदारास मा. न्यायालयामार्फत कोणत्याही बाबतीत दुहेरी फायदा होणार नाही याची उप जिल्हाधिकारी तथा भूसंपादन अधिकारी क्र.१, सोलापूर यांनी दक्षता घ्यावी.

ई) लेखाशिर्ष ८६७४ - शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी अंतर्गत येणाऱ्या न्यायालयाच्या किंवा न्यायाधिकरणाच्या न्यायनिर्णयाची, हुकुमनाम्याची किंवा निवाडयाची पूर्ती करण्याबाबत वित्त विभागाने दिनांक १२/०८/२०१४ व ३/०६/२०१५ रोजी परिपत्रके निर्गमित केली आहेत. त्यानुसार तसेच अशा प्रकरणी वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या परिपत्रक / शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशानुसार कार्यवाही करावी.

३. यावर होणारा खर्च हा " ८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रक्कमा (संगणक संकेतांक -८६७४-००१९) " या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उपरोक्त लेखाशिर्षाखाली देण्यात आलेली मंजूर रक्कम ही अंतीम आहे. त्यानुषंगाने

अ) जर वरिष्ठ न्यायालयात दाखल करण्यात आलेल्या अपिलाचा अंतिम निकाल शासनाच्या बाजून लागला तर या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेली रक्कम न्यायालयाकडून काढून त्या रकमेचा भरणा " ८६७४- शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी-१०१, शासनाने ठेवलेल्या प्रतिभूती ठेवी- (अ) न्यायालयाकडे जमा केलेल्या प्रतिभूती रक्कमा (संगणक संकेतांक -८६७४-००१९) " या लेखाशिर्षाखाली करावा लागेल. मात्र

ब) जर वरिष्ठ न्यायालयाचा निकाल शासनाच्या विरुध्द बाजुने लागला तर सदरहू रक्कम उपरोक्त (अ) मधील लेखाशिर्षाखाली जमा दर्शवून, मागणी क्र. झेड एच -५, प्रधान लेखाशिर्ष ४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, (००), (१०१) भूपृष्ठ जल, (०१) लहान पाटबंधारे, (०१) (०२) लहान पाटबंधारे योजना, १०१ ते २५० हे.सि. क्षमता (कार्यक्रम) (४७०२ ए०२८), ५३- मोठी बांधकामे या अंतीम लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा लागणार आहे. त्या परिस्थितीमध्ये जिल्हा जलसंधारण अधिकारी,

मृद व जलसंधारण विभाग, सोलापूर हे आवश्यक त्या "भारीत निधी" मंजुरीबाबतचा सविस्तर प्रस्ताव विहीत मार्गाने शासनाच्या मान्यतेसाठी सादर करतील.

५. उप जिल्हाधिकारी तथा भूसंपादन अधिकारी क्र. सोलापूर, यांनी मा. वरिष्ठ न्यायालयामधील अपिलाचा निकाल लागल्याबरोबर या प्रकरणी आवश्यक ती कार्यवाही त्वरीत करावी आणि केलेल्या कार्यवाहीचा अहवाल मृद व जलसंधारण यंत्रणेमार्फत शासनास सादर करावा.

६. प्रस्तुत आदेश संदर्भिय वित्त विभागाच्या परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१७१२५७००६८२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार वा नांवाने.

RAJESH HEMCHAND BAGDE

Digitally signed by RAJESH HEMCHAND BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=ed7af9a8be3d880eda8e29b769ac16864ea0732c103c7f011129ff654701c22c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B7A690C5B955786C61B12D2A97A09E71E030D081D0786B3D4740E1A0078F4684, cn=RAJESH HEMCHAND BAGDE
Date: 2025.02.17 12:57:54 +05'30'

**( रा.हे. बागडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) जिल्हाधिकारी, सोलापूर.
२) अपर आयुक्त तथा मुख्य अभियंता, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे.
३) प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, पुणे .
४) उप जिल्हाधिकारी तथा भूसंपादन अधिकारी क्र.१, सोलापूर.
५) जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग, सोलापूर.
६) महालेखापाल (लेख व अनुज्ञेयता) / (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर.
८) कक्ष अधिकारी (जल-११), मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) निवड नस्ती, कार्यासन /जल- ४.

**प्रत अग्रेषित,**

१. मा. विरोधी पक्ष नेता (विधान परिषद) विधानमंडळ, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२. मा. मंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (मृद व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
४. स्थानिक लोकप्रतिनिधी (मार्फत संबंधीत लघु सिंचन (जलसंधारण) उपविभागीय अभियंता)
५. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई. (यांचे स्वीय सहायक)
६. आयुक्त, मृद व जलसंधारण विभाग, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर.